**भुसंपादन प्रकरणांमध्ये प्राधान्याने संयुक्त मोजणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मोजणी २०१४/प्र.क्र.२५६/ ल १**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १/ १२/२०१४

**प्रस्तावना**

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ मधील कलम १२७ अन्वये बजावलेल्या सुचनांच्या अनुषंगाने जमिनीचे सर्वेक्षण व मोजणीच्या कार्यवाहीस विलंब होत असल्याने भूसंपादनाची कार्यवाही विहित मुदतीत होत नाही व त्यामुळे मंजूर शहर विकास योजनेतील आरक्षण व्यपगत होते, असे निरीक्षण मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडे दाखल केलेल्या रिट याचिका क्रं. ११९३१/२०१२ मध्ये नोंदविण्यात आलेले आहे. परिणामी, भूसंपादन प्रकरणांमधील जमिनीची संयुक्त मोजणीची कार्यवाही करण्याकरीता होणारा विलंब टाळण्याबाबत शासनाने योग्य ती उपाययोजना करण्याबाबत सुचित केले आहे. त्याअनुषंगाने अशा प्रकरणी जमिनीचे सर्व्हेक्षण व मोजणीची कार्यवाही तातडीने करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ अंतर्गत मंजूर शहर विकास योजनेतील आरक्षणाखालील जमिनीच्या भूसंपादनासाठी जिल्हाधिकारी किंवा उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रकरणात सर्वोच्च प्राधान्याने जमिनीची संयुक्त मोजणी करण्यात यावी. त्याकरीता जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, उप अधीक्षक भूमि अभिलेख, किंवा नगर भूमापन अधिकारी, भूमि अभिलेख यांनी त्यांच्याकडे अशी प्रकरणे प्राप्त झाल्यानंतर सर्वोच्च प्राधान्य देऊन जमिनीची मोजणी करावी. अशा जमिनीच्या मोजणीस सर्वोच्च प्राधान्य देण्यासाठी मोजणीच्या तारखा निश्चित करण्याच्या अनुषंगाने ई-मोजणी आज्ञावलीमध्ये योग्य ते बदल करण्यात यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०११५२४५१८७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Hemant Waghmare
Digitally signed by Vidya Hemant Waghmare
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidya Hemant Waghmare
Date: 2014.12.01 15:33:07 +05'30'

**( विदया वाघमारे )**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान सचिव (न वि १), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य
४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) विभागीय आयुक्त, पुणे/मुंबई/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
६) जिल्हाधिकारी ( सर्व)
७) उप सचिव (भूसंपादन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उपसंचालक भुमी अभिलेख, पुणे/मुंबई/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
९) जिल्हा अधीक्षक भूमी अभिलेख (सर्व )
१०) उप जिल्हा अधीक्षक भूमी अभिलेख (सर्व )
११) नगर भूमापन अधिकारी (सर्व)